**महिला व बालविकास विभागाच्या अधिपत्याखालील महिला व बाल विकास आयुक्तालय कार्यालयातील महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांक** : मबाआ- २०१८/प्र.क्र.१३६/कार्या-७

हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक : २९ ऑक्टोबर, २०१८.**

<u>वाचा</u>- १) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे-२०१३/प्र.क्र.१२४/२०१३/ आस्था-३ दिनांक २८.५.२०१३

२) ग्राम विकास विभागाचे पत्र क्र.मविसे-१०१८/प्र.क्र.२१५/२०१८/ आस्था-३, दिनांक ५.९.२०१८

३) मु.का.अ.रायगड जि.प.अलिबाग यांचे पत्र जा.क्र.राजिप/बा.क./कात-१/२०१८ दिनांक ५.६.२०१८

४) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्या-१२ दिनांक १७.१२.२०१६

**<u>आदेश</u>**

वाचा क्र.१ येथिल शासन निर्णयान्वये ग्रामविकास विभागाकडून या विभागाकडे हस्तांतर करण्यात आलेल्या महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद वर्ग-१ व तत्सम पदांमध्ये रिक्त पदांचे प्रमाण अधिक असल्याने सामान्य प्रशासन विभागाने सदर पदांपैकी सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्यास दिलेल्या सहमतीस अनुसरून वाचा क्र.२ येथिल पत्रान्वये प्राप्त सहमतीच्या अनुषंगाने, महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांच्या कार्यालयातील महिला व बाल विकास अधिकारी , जिल्हा परिषद (वेतनश्रेणी रू. १५,६००-३९,१०० ग्रे.पे.५४०० ) या पदावर खालील नमूद अधिकारी यांच्या सेवा प्रथमत: एक वर्ष अथवा सदर पदावर सरळसेवेने अधिकाऱ्यांची नियुक्ती होईपर्यंत, यापैकी जे आधी घडेल तो पर्यंतच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने उपलब्ध करून देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | सध्याचा विभाग | प्रतिनियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १. | श्री.एन.जी.मंडलिक, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, महाड, जिल्हा रायगड | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, महाड, जिल्हा रायगड | महिला व बालविकास अधिकारी (जि.प.),रायगड जि.रायगड |

श्री.मंडलिक यांच्या प्रतिनियुक्तीवरील सेवा खालील अटींच्या अधीन राहतील.

अ) उपरोक्त अधिकारी ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्ती सेवेचा प्रारंभ होईल. त्यांनतर प्रतिनियुक्ती पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांच्या सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार/ सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर, त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे, आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मूभा राहिल.

२. उपरोक्त अधिकाऱ्यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी ग्राम विकास विभाग तसेच महिला व बाल विकास विभागामार्फत हाताळण्यात येतील.

३. सदरची प्रतिनियुक्ती विनंतीनुसार असल्याने सदर अधिकाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय राहणार नाही. तसेच वेतनभत्ते, रजा ,प्रवास सवलत, वैद्यकीय सवलत, गटविमा योजना इ. सेवा विषयक बाबी संदर्भात त्यांच्या मूळ सेवेचे नियम लागू असतील.

४. संबंधित अधिकाऱ्यास प्रतिनियुक्तीच्या जागी नियुक्ती होण्याकरिता ग्रामविकास विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

५. सदर आदेश ग्राम विकास विभागाचे पत्र क्र.मविसे-१०१८/प्र.क्र.२१५/२०१८/ आस्था-३, दिनांक ५ सप्टेंबर,२०१८ नुसारच्या ग्रामविकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर संबंधित अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होवून तसा अहवाल शासनास सादर करावा.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०२९१६०१०४६५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.10.31 16:59:24 +05'30'

(ला.रा.गुजर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्री.एन.जी.मंडलिक, गट विकास अधिकारी, पंचायत समिती महाड, जि.रायगड.

**प्रत:-**

१) सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२) मा.प्र.सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
४) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, बेलापूर, नवी मुंबई
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,रायगड, जि.रायगड.
६) मा.मंत्री, (म.व.बा.वि), यांचे खाजगी सचिव महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मा.राज्यमंत्री, (म.व.बा.वि), यांचे खाजगी सचिव महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), मुंबई
९) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
१०) निवड नस्ती का-७